# काव्यवाचन : छापा आणि काटा

अलीकडे मराठी साहित्यविश्वात दिलीप चित्रे यांनी केलेल्या काही विधानांनी फारच खळबळ उडालेली दिसते. चित्रे यांच्या मते 'पाडगावकर-बापट-करन्दीकर' ह्या त्रयीने मराठीत काव्यवाचन करून केवळ बघे निर्माण केले त्यामुळे गंभीर कवितेपासून ह्या रसिकांची नाळ तुटून अत्यंत उथळ कवितेच्या आहारी हा वर्ग गेला.

चित्रे यांच्या विधानाला आक्षेप घेऊन 'कवितेच्या गावा जावे' हा कार्यक्रम सादर करणाऱ्या अरुण म्हात्रे आणि अशोक नायगावकर ह्या द्वयाने त्यांच्यावर घणाघाती टीका केली. (पाहा 'महाराष्ट्र टाइम्स' १० सप्टेंबर, १९९३ बहुतांची अंतरे) त्यांच्या एकंदर पत्राचा आशय असा दिसतो की, मराठीची सांस्कृतिक दैना आज इतक्या थराला पोहोचली आहे की सर्वसामान्य वाचकांपासून कविता पूर्ण तुटून ती केवळ विशिष्ट उच्चभ्रू व बुद्धिजीवी वर्गात घुटमळत आहे. ह्याला लिटल मॅगेझिनवाले जबाबदार आहेत. त्यांनीच वाचकांपासून काडीमोड घेऊन कविता त्यांच्यापासून दूर ठेवली.

चित्रे यांच्या आतापर्यंतच्या वक्तव्यावरून (उदा. साहित्यसंमेलनाला त्यांनी उरूसं म्हटलंय) त्यांचा समूहासाठी उत्सवी काव्यवाचन करायला विरोध आहे असे दिसते; पण चित्रेंची विश्लेषण कधीही धड न करण्याची समीक्षा पद्धत त्यांनी इथेही वापरल्याने त्यांना तसे का वाटते हे काही स्पष्ट होत नाही. त्या मानाने म्हात्रे-नायगावकर अधिक स्वच्छ नजरा घेऊन उभे आहेत. मात्र त्यांनीही सुसंगतपणे विश्लेषण केलेले आढळत नाही. तेव्हा प्रत्यक्षात काव्यवाचनाच्या ह्या समस्येचे आकलन नीट होण्यासाठी दोन्ही बाजूंनी ही समस्या तपासणे अत्यंत आवश्यक वाटते. चौथ्या नवतेचा शोध घेताना काव्यवाचनाच्या समस्येची दखल घेणे आम्हाला गरजेचे वाटते. कारण कुठलीही नवता केवळ जन्मून चालत नाही तर तिचा लोकात विस्तार व प्रसारही व्हावा लागतो. काव्यवाचन हे ह्या प्रसाराचे पूर्वापार चालत आलेले माध्यम वा मिडीया असल्यानेच त्याचा विचार आम्ही इथे करत आहोत.

प्रथम आपण काव्यवाचन का करावे ह्यासाठी करता येणारे युक्तिवाद मांडू..

(१) मराठी काव्यपरंपरा ही मूलत: मौखिक आहे. इथे अभंग वाचण्यापेक्षा ऐकले जात होते. इथे लावण्या वाचण्यापेक्षा गायल्या आणि ऐकल्या जात होत्या. काव्यवाचन म्हणजे ही मौखिक परंपराच पुढे चालवणे होय. मराठी संस्कृतीतील काव्य-परंपरेचे काव्य वाचनामुळे जतन

होते.

(२) काव्यवाचन म्हणजे एका हृदयाने दुसऱ्या हृदयाशी साधलेला संवाद. राम शेवाळकर यांनी म्हटल्याप्रमाणे (प्रत्यक्षात हे विधान त्यांच्या मित्राचे आहे. त्याचे नाव मला आठवत नाही) प्रत्येक कवी हा बोलका रसिक असतो तर प्रत्येक रसिक हा मुका कवी असतो. लेखनात असा हृदयापासून हृदयापर्यंत जिवंत प्रवास होत नाही; कारण तिथे छापलेले शब्द हे शेवटी यांत्रिक आणि निर्जीव असतात. काव्यवाचनात प्रत्यक्ष कवीच्या तोंडून शब्द येत असल्याने ते जिवंत व सजीव असतात, म्हणून काव्यवाचन ही सचेतन अनुभवप्रक्रिया बनते म्हणून ते श्रेष्ठ होय.

(३) सस्यूर ह्या भाषाशास्त्रज्ञाने प्रतिपादन केल्याप्रमाणे भाषा ही मूलत: मौखिक असते. तिचे लेखनरूप हे दुय्यम असते. कवितेतील भाषाही मूलत: मौखिक असते, तेव्हा अशी मौखिक भाषा प्रत्यक्ष कवीच्या मुखातून बाहेर पडते तेव्हा ती मूळ रूपात अस्सल स्वरूपात असते; त्यामुळे रसिकांपर्यंत कविता ही खऱ्या अर्थाने पोहोचते.

(४) मराठी संस्कृती ही मौखिक परंपरेने बद्ध असल्याने ह्या संस्कृतीतील रसिकांना वाचनाची अद्याप सवय नाही, अशा वाचनपराङ्मुख रसिकांपर्यंत पोहोचायचे असेल तर संहिता वाचनाला पर्याय नाही. वाचनामुळेच मोठ्या प्रमाणावर रसिकवर्गापर्यंत कविता पोहोचते.

(५) पुस्तकातील कविता ही अनेकदा केवळ पुस्तकी लोकांपर्यंत राहाते. केवळ प्राध्यापक आणि बुद्धिमंतांच्या वर्तुळात अशी कविता फिरत राहते. एका विशिष्ट उच्चभ्रू वर्गाची ती मिरासदारी बनते. काव्यवाचनामुळे ही कविता सामान्य जनांपर्यंत पोहोचते. ती केवळ बुद्धिमंतांनी चर्चा करण्याचे साधन न राहता संस्कृतीच्या संपूर्ण अंगाचा एक भाग बनते.

(६) सर्व कला ही प्रचारकी असते. कविता हे प्रगतीशील जनवादी चळवळीचे इतर कलांप्रमाणेच एक हत्यार आहे. कवी हा समाजातील पारंपरिक मूल्यांविरुद्ध लढणारा नव्या मनूचा नवा शिपाई असतो. सर्व प्रगतीशील चळवळी ह्या जनांसाठीच असल्याने काव्य हे जनांसाठीच असते. ह्या जनांपर्यंत पोहोचायचे असेल तर काव्यवाचनाशिवाय पर्याय नाही. मराठी रसिकांचा वाचनापेक्षा ऐकण्यावर भर असल्याने त्यांच्यापर्यंत पोहचायचे असेल तर आपण काव्यवाचन करायलाच हवे. ते आपल्यापर्यंत पोहोचतील ह्या भ्रमात कोणी राहू नये. शेवटी पर्वत महंमदाकडे येत नसेल तर महंमदानेच पर्वताकडे जायला हवे.

(७) काव्यवाचन केल्याने सर्वसामान्य रसिकांची अभिरुची उंचावते. तो अनेकदा कविता ऐकून लिखित कविता वाचण्याकडे वळतो. ह्यामुळे कवितेचा फायदाच होतो. रसिकांच्या संख्येत

वाढ होते. त्यांच्यापर्यंत कवितेतले नवीन नवीन प्रयोग पोहोचतात.

(८) काव्यवाचनामुळे कवीला प्रसिद्धी व पैसा मिळतो. कवींशी रसिकांचा थेट परिचय होतो. ज्या रसिकांना कवी कसा आहे हे पाहावयाचे असते, त्यांना कवी पाहावयास मिळतो. कवी प्रत्यक्ष रसिकांत मिसळतो. कवीच्या कविता प्रत्यक्ष पोहोचतात. नव्या कवितेवर चर्चा करण्यापेक्षा नवी कविता अशी थेट पोहोचवणे हे योग्य होय.

अरुण म्हात्रे, नायगावकर, सौमित्र यांच्यापासून पाडगावकर, बापट, करन्दीकर यांच्यापर्यंत सर्व कवी जेव्हा काव्यवाचन करतात तेव्हा त्यामागे हीच भूमिका असते. ह्या भूमिकेच्या विरोधात असलेली भूमिका मात्र मराठीत कोणी विस्ताराने मांडलेली नाही. तेव्हा आपण ही विरोधी भूमिकाही नीट मांडू. सर्वसाधारणपणे काव्यवाचनाच्या विरोधात पुढील मुद्दे मांडता येतील :

(१) मराठी काव्यपरंपरा ही प्रामुख्याने मौखिक होती हे मान्य, पण ती मौखिक राहण्यामागे आपले वैज्ञानिक मागासलेपण कारणीभूत होते. जोपर्यंत छपाईचा शोध लागला नव्हता तोपर्यंत मौखिक परंपरा योग्यच होती. पण आता विसाव्या शतकातही कवितेची परंपरा मौखिक राहावी अशी अपेक्षा करणे मूर्खपणाचे होईल. आता कविता लिहिलीच जाते आणि म्हणूनच आधुनिक काव्याची परंपरा ही लेखीच मानायला हवी. शेवटी केशवसुत आपल्यापर्यंत पोहोचले ते लेखी परंपरेतून. आजही हयात नसलेले सर्व कवी, अगदी ज्ञानेश्वर-तुकारामदेखील, आपणापर्यंत लेखी परंपरेनेच पोहोचतात. तेव्हा मौखिक परंपरा होती म्हणून आताही ठेवा हे म्हणणे अडाणीपणाचे होईल. शेवटी संस्कृती ही गतिशील प्रक्रिया आहे. ती सतत बदलत असते. म्हणूनच कवितेचे मौखिकतेकडून लेखी स्वरूपाकडे वळणे अटळ आहे.

(२) हृदयाचा हृदयाशी संवाद केवळ काव्यवाचनामुळे होतो हा केवळ कल्पनाविलास आहे. काव्यलेखनातही असाच संवाद असतो व त्याची गुणवत्ता तशीच असते. अनेकदा काव्यवाचन करणारा खराब असेल तर हा 'हृदय टू हृदय' संवाद बिघडण्याचीच शक्यता जास्त असते. दिलीप चित्रेंच्या कविता ऐकण्यापेक्षा पुस्तकातून वाचलेल्याच अधिक चांगल्या वाटतात. अनेकदा काव्यवाचनात शब्दांचे नेमके वजन, आकार, घनता व्यक्त झाल्याने कवितेचा कवीच्या मनात असलेला अर्थ स्पष्टपणे कळतो. त्यामुळे अर्थाच्या काही संभाव्यता नष्ट होतात. रसिकाच्या कल्पनाशक्तीला मर्यादा पडतात. त्यामुळे काव्यवाचन नेमका अर्थ पोहोचवते हा त्याचा प्लस पॉईंट सकृतदर्शनी योग्य वाटला तरी रसिकाला अनेक अर्थ; लावण्याचे मिळालेले स्वातंत्र्य नष्ट होते हा त्याचा मायनस पॉईंट ठरतो.

(३) सस्युरने प्रतिपादन केल्याप्रमाणे भाषा ही मूलत: मौखिक असते, तिचे लेखनरूप दुय्यम असते हा सिद्धांत अलीकडे कुणी मान्य करत नाही. जॅक देरीदा याने सस्यूरचे हे प्रतिपादन खोडून काढून भाषेचे लेखनरूप हेच महत्त्वाचे आहे असे प्रतिपादन केले आहे. तेव्हा भाषा ही मौखिक आणि लेखी अशा दोन्ही रूपात सारखीच तुल्यबळ असते. तिची ही दोन्ही रूपे अस्सल आहेत. तेव्हा काव्यवाचनातच कवितेचे अस्सल भाषारूप पोहोचते असे प्रतिपादन करण्यात अर्थ उरत नाही.

(४) मराठी रसिक वाङ्मयपराङ्मुख आहेत हे खरे; पण त्यावर उपाय काव्यवाचन नाही, तर मराठी रसिक पुस्तकाकडे कसे वळतील ते पाहणे होय. अशा रसिकांपुढे काव्यवाचन करणे म्हणजे आळश्याला अफू पाजणे होय. तेव्हा अशा रसिकांपुढे काव्यवाचन करण्याऐवजी ते श्रम ग्रंथप्रसारासाठी लावले तर ते अधिक सार्थकी लागतील.

(५) पुस्तकातील कविता ही फक्त बुद्धिमंतांच्या वर्तुळातच फिरत राहते. काव्यवाचनामुळे ही कविता सामान्य जनांपर्यंत पोहोचते असे नेहमीच काव्यवाचनाचे समर्थक म्हणतात. कविताच काय, कोणत्याही गोष्टीबाबत एक सत्य लक्षात घ्यायला हवे. कुठलीही गोष्ट प्रथम महाजनांची असते व नंतर ती बहुजनांची होते. (इथे महाजन ही संज्ञा अभिजात रसिक लोक अशा अर्थाने वापरलेली आहे.) अगदी टी.व्ही.देखील प्रथम काही लोकांसाठी होता व नंतर तो सर्वसामान्यांचा झाला. केशवसुतांचा वाचकवर्ग प्रथम मर्यादित होता. नंतर तो वाढत गेला. तेव्हा आता जी कविता काही महाजनांची आहे ती नंतर बहुजनांची होणार आहे. मात्र कवितेबाबत एक गोष्ट मूलत: लक्षात घ्यायला हवी, शेवटी कवितेचा वाचकवर्ग मर्यादितच राहतो. खरंतर कविताच काय अभिजात चित्रपट, शिल्प, चित्र यांचे रसिक हे मर्यादितच असतात. कुठल्याही समाजात (१) महाजन, (२) बहुजन असे रसिकतेचे दोन स्तर कायम राहतात. महाजनांच्या रसिकतेतून अभिजात संस्कृती तर बहुजनांच्या रसिकतेतून लोकसंस्कृती अशा दोन संस्कृती प्रत्येक संस्कृतीत नांदत असतात. कविता ही गुंतागुंतीची रचना असल्याने ती स्वभावत:च महाजन संस्कृतीकडे कलते. तेव्हा तुम्ही कितीही काव्यवाचनाचे प्रयोग केले तरी कविता ही महाजनांच्यातच फिरत राहणार. आमचा म्हात्रे-नायगावकर वगैरे प्रभृतींना सवाल आहे की, करन्दीकर- बापट-पाडगावकर या त्रयींने काव्यवाचन करून काय साधले ? ह्यांनी जर बघे निर्माण करण्याऐवजी रसिक निर्माण केले तर रसिक गेले कुठे ? खुद्द ह्या त्रयींच्या काव्यसंग्रहांच्या खपाचे आकडे काय दर्शवितात ? म्हात्रे, नायगावकर यांचे संग्रह किती खपले ? जर ह्यांनी रसिक निर्माण केले तर मग ह्यांचे

काव्यसंग्रह असे पडून राहिले असते काय ? म्हात्रेंना अक्षर चळवळीसाठी अशी वणवण का करावी लागली असती ? साहित्य संमेलनाला पाच-पाच हजारांच्या उपस्थितीत काव्यवाचन करणाऱ्या नारायण सुर्वे, अशोक नायगावकर ह्यांच्या काव्यसंग्रहाच्या ह्या संमेलनात धड दहादेखील प्रती गेलेल्या नाहीत हा आमचा अनुभव आहे. तेव्हा काव्यवाचनामुळे आम्ही मराठी काव्य-रसिकवर्ग वाढवतो हा ह्या प्रभृतींचा गैरसमज आहे, तो त्यांनी लवकरात लवकर काढून टाकावा हे उत्तम. ह्यावर म्हात्रे, नायगावकर म्हणतील की आम्ही कवितासंग्रह खपावेत म्हणून काव्यवाचन करत नाही तर रसिकाची अभिरुची व तिचा दर्जा वाढावा म्हणून काव्यवाचन करतो. त्यावर आम्ही त्यांना विचारतो की, हा रसिक खरोखरच गंभीर असतो काय ? तुमच्या काव्यवाचनाने त्याच्या अभिरुचीत काही फरक पडतो काय ? 'चोली के पिछे क्या हैं' सारखी फिल्मी गाणी आणि तुमच्या कविता सारख्याच चविष्टपणे एन्जॉय करणारा हा रसिकवर्ग असेल तर तुमचे काव्यवाचन म्हणजे मनोरंजनाचा एक फिल्मी कार्यक्रम बनत नाही काय ? आज काव्यवाचनाचे कार्यक्रम ऐकले की मराठीत खरोखरच मर्ढेकर, चित्रे व कोलटकर ह्यांसारखे कवी आहेत/होऊन गेलेत काय ? अशी शंका येते. काव्यवाचनातील बहुतेक कविता म्हणजे परिपक्व भावगीते (भले ती मुक्तछंदात असतील) असतात. रविकिरण मंडळाच्या सुधारित आवृत्त्या म्हणजे ह्या कविता ! समाजाला अशा उच्चभ्रू रोमॅन्टिसिझमची गरज असते आणि हे काव्यवाचनाचे कार्यक्रम ती गरज भागवतात. ह्यापलीकडे त्यातून काहीही साध्य होत नाही. साध्य झाले आहे असे दिसत नाही. पूर्वी साहीर लुधियानवी, शकील बदायुनी, पाडगावकर, बापट, भट वगैरेंनी ही गरज भागवली. आता सौमित्र म्हात्रे, नायगावकर आणि जगजीतसिंग, गुलाम अली ज्यांच्या गझला गातात ते गझलकार ही गरज भागवतात एवढेच, अनेकदा तर मराठी कविता म्हणजे पाडगावकर-बापटांची भावूक कविता असे काहीतरी विपरीत समीकरण तयार झालेले दिसते आणि हे समीकरण नवीन श्रोत्यांच्या डोक्यात एकदा बसले की त्यांची रसिकता तिथेच थांबते. जर काव्यवाचने अशा प्रकारचा विपरीत परिणाम घडवत असतील आणि असे रोमॅण्टिक दहीवरात भिजणारे श्रोते निर्माण करत असतील तर अशी काव्यवाचने हवीत कशाला ?

(६) अनेकदा ह्या काव्यवाचनाच्या कार्यक्रमात कवी रसिकांच्या अभिरुचीची उंची वाढवण्याऐवजी त्यांच्या अभिरुचीप्रमाणे खाली येतात. कलावंतीणीला हवे ते गाणे म्हणायला सांगणाऱ्या रसिकाप्रमाणे हे रसिक असतात आणि कवीदेखील कधी कधी खुषीने तर कधी नाखुषीने रसिकांच्या पातळीवर उतरतो. कित्येकदा श्रोत्यांच्या आवडीच्या ठराविक कविताच सादर करतो. ह्यामुळे रसिकांची अभिरुची उंचावण्याचे स्वप्न हवेतच विरलेले दिसते.

(७) काव्यवाचनातील सर्वात मोठा धोका म्हणजे अनेकदा रसिकांच्या अभिरुचीचा दर्जा वाढण्याऐवजी कवींच्या कवित्वाचा दर्जा ह्या काव्यवाचनाच्या सवयीमुळे घसरलेला दिसतो. ह्या आणि वरील मुद्याचा विचार करण्यासाठी तीन पिढ्यांची उदाहरणे पुरेशी आहेत. पहिली पिढी करन्दीकर, बापट, पाडगावकरांची, दुसरी म्हात्रे, नायगावकर, सौमित्र यांची, तिसरी अश्वत्थामा-जयसिंग पाटील, श्रीधर तिळवे यांची.

आचार्य अत्रे यांनी रविकिरण मंडळाबाबत लिहिताना म्हटले होते की, ह्या मंडळात माधव ज्युलियन हेच फक्त रवी व बाकीचे किरण होते. ह्या त्रयीबाबतही हेच म्हणता येईल. ह्या तिघांच्यात करन्दीकर हेच फक्त कवी आणि उरलेले दोघे हे चांगले गीतकार आहेत. (गीतकार असणे हे वाईट असते असे सुचवायचे नाही; पण कोणी गीतकार स्वत:ला महान कवी म्हणवून घेत असतील तर मात्र त्याची जागा त्याला दाखवून द्यायलाच हवी असे प्रामाणिकपणे वाटते) ह्या गीतकारांच्यात चांगले कवी होण्याची निश्चित क्षमता होती; पण दोघांनीही काव्यवाचनाच्या सोप्या क्लृप्त्यांना आणि घोळदार टाळ्यांना शरण जाऊन आपले कवित्व रसिकांच्या पायदळी तुडवण्यासाठी अर्पण केले. त्यासाठी वात्रटिकांपासून बोलगाण्यांपर्यंत नाना नाटके केली. ह्या साऱ्या नाटकातून त्यांच्यातला गीतकार वेगवेगळे विदुषकी अवतार घेत.टाळ्यांचे सलाम घेत आनंदयात्रीचा खोटा आव आणून उत्सव साजरा करत सह्याद्रीच्या उरसात प्रकट होत राहिला. बोरकर आणि शिरवाडकरांनीही रोमॅन्टिक रचना केली. पण त्यांचे कधी गीतकार झाले नाहीत, कारण काव्यवाचनाचा कैफ कधीच दोघांनाही चढला नाही. बापट आणि पाडगावकर हे ह्या काव्यवाचनाचे बळी आहेत. करंदीकरांसारखा जबर प्रायोगिक कवीही नाट्यधर्मी प्रतिमेकडे अधिक झुकत गेला आणि अधूनमधून चमत्कृतीच्या गिमिक्समध्ये अडकत राहिला. सुदैवाने करंदीकरांची प्रतिभा ही जाणीवलक्ष्यी असल्याने त्यांचा गीतकार झाला नाही. दुसऱ्या पिढीतील म्हात्रे, नायगावकर, सौमित्र यांच्या उदाहरणांबाबत काय दिसते ? त्यांच्या कवितेत काही दुष्परिणाम चटकन् दिसतात. 'गर्दी' आणि 'तरीही मी असत नाही', 'रेल्वे : काही टिपणे', 'गेली ३३ वर्षे' सारख्या चांगल्या कविता लिहिणारे अरुण म्हात्रे ह्या काव्यवाचनाच्या रोमॅण्टिक वावटळीत सापडून आपला पिंड नसतानाही भटांसारखे गोड गोड आणि थुलथुलीत पण टाळ्या घेणारे लिहितात. तेव्हा तो काव्यवाचनाचा दुष्परिणाम नसतो का ? नायगावकरांची कविता ही अनेकदा गरज नसताना कण्ठाळी बनते, नाटकी आविष्कार करते. हा कशाचा परिणाम आहे ? नायगावकरांनी हल्ली सारे पुढारी कवितेसाठी भाड्याने घेतलेत की काय समजत नाही ? टिळक, ज्योतिबा ते गांधीपर्यंत नायगावकर एका विशिष्ट पद्धतीनेच दळण दळताहेत हे त्यांच्या लक्षात येत नाही का ? त्यांच्या

कवितेतल्या केवळ आवाजी समूहसुरापेक्षा व्यक्तिगततेकडून समूहाकडे सहज जाणारा स्वर अधिक प्रभावी आहे. हे त्यांना समजावून सांगायला हवे का ? सौमित्रच्या रोमॅण्टिक गुबगुबीत कविता ऐकून हा माणूस महेश एल्कुंचवारची प्रायोगिक नाटके सादर करतो ह्यावर कोण विश्वास ठेवेल ? नाटकातल्या स्वगताचा स्वर सौमित्रच्या सर्वच कवितांना व्यापून राहिलाय आणि ह्यात एका वेगळ्या प्रकारच्या रसिक अनुनयाचा प्रभाव मिसळलाय हे सहज लक्षात येते. जर काव्यवाचनाचे हे दुष्परिणाम असतील तर मग काव्यवाचन कशासाठी करायचे ? स्वत:च्या कवित्वाचा बळी देऊन काव्यवाचन करणे कितपत इष्ट आहे ?

तिसरी पिढी ही प्रातिनिधिक नाही आणि तिचे कार्य केवळ कोल्हापुरपुरते मर्यादित होते. (तिघांनीही नंतर काव्यवाचन बंद केले) त्यामुळे फक्त तिची काही निरीक्षणे ठेवतो.

(अ) ह्या काव्यवाचनात तिघांच्याही नाट्यधर्मी कवितांनाच दाद मिळत राहिली. गंभीर कविता रसिकांच्या डोक्यावरून गेली.

(ब) 'श्रद्धांजली' 'कवितेऐवजी रद्दी विकली असती' ह्या अश्वत्थामा यांच्या कविता, पाटील यांच्या 'फुलपांखरे' व तिळवे यांच्या गझलांना पुन:पुन्हा मागणी येत राहिली. ह्यावरून रसिकांना नवीन काही ऐकण्यापेक्षा त्याच त्याच कविता ऐकण्यात रस असतो असे दिसत होते. कित्येक कवी पाच-पाच वर्षे ठराविक दोन कविताच वाचतात हे दिसून आले. हे विषण्ण करणारे होते. तिळवे यांनी प्रत्येक वेळी नवीन कविता वाचण्याचा पायंडा पाडण्याचा प्रयत्न केला, पण तो यशस्वी झाला नाही. इतर कवींनी प्रतिसाद दिला नाही. सर्वांना हुकमी दाद हवी होती.

(क) तिळवे यांनी अश्लील शब्द असलेल्या कविता मुद्दाम वाचावयास सुरुवात केली. दोन मैफिलीत रसिक बसून राहिले. तिसऱ्या मैफिलीला काव्यवाचन करावयास तिळवे उभे राहिले आणि दोन मिनिटांत सभागृहातील समस्त स्त्रीवर्ग उठून गेला. नंतर हे नित्याचेच झाले. तिळवेंच्या गझलांना दाद देणारा हा वर्ग नंतर त्यांना अस्पृश्य मानायला लागला. हळुहळू तिळवेंचे काव्यवाचन बंद पडले. नंतर अश्वत्थामा व पाटील यांनी काव्यवाचन बंद केले. कारण सर्वांनाच कंटाळा यायला लागला. लोक पाडगावकरांच्या पुढे कधीही गेले नाहीत. कवी पाडगावकर भटांसारखे लिहिण्यात धन्यता मानत होते. काहींचा आदर्श तर जगदीश खेबूडकर होते.

(ड) काव्यवाचनात भयंकर कंपूशाही चालते हे दिसून आले. कोल्हापुरात दि. घों. कुलकर्णी, अनिल द्रवीड, विजय पवार, सुहास एकसंबेकर, अश्वत्थामा हे प्रतिभावान कवी असूनही ह्यांना कधीही कविसंमेलनाची आमंत्रणे गेली नाहीत. अगदी कोल्हापुरच्या साहित्य संमेलनातही ह्यांच्याऐवजी अत्यंत भुरट्या कवींना मंचावर स्थान होते.

वरील सर्व निरीक्षणांवरून स्पष्ट दिसते की काव्यवाचनाच्या नावाखाली आज जे काही चालल्येय ते फारसे ठीक नाही. उलट चित्रे म्हणतात त्याप्रमाणे खरोखरच ह्या उत्सवामुळे रसिकांची गंभीर कवितेपासून नाळ तुटलेली दिसते आणि बघे निर्माण झालेले दिसतात. काव्यवाचनाच्या सहास्य निवेदनात बोलायचे तर श्रोते आहेत पण रसिक कुठे आहेत ? स्टेजवर वाचक आहेत, पण कवी कुठे आहेत ? मंचावर विदूषकांची आणि सभागृहात बघ्यांची गर्दी !

ह्या सर्व प्रकारात कवी हळूहळू हुकमी, टाळ्या घेणारे लिहायला लागतात. कोणी कितीही, काहीही म्हटले तरी कधी जाणिवेच्या तर कधी नेणिवेच्या पातळीवरून हे काव्यवाचन त्या त्या कवीवर वर्चस्व गाजवायला लागते. अरुण म्हात्रे, अशोक नायगावकर, श्रीधर तिळवे यांचे पहिले काव्यसंग्रह नीट तपासले तर त्यात काव्यवाचनातील नाट्यधर्मी संकेताचे पडसाद स्पष्ट उमटलेले दिसतात. ह्या तिघांनी आपल्या कविता ह्या दृष्टीने खरोखरच नीट तपासून पाहाव्यात. विशेषत: नायगावकर आणि तिळवे यांच्या कवितेत अधूनमधून विद्रोहाचे रूपांतर आक्रस्ताळेपणात झालेले दिसते आणि त्याला निश्चितच काव्यवाचन हे एक महत्त्वाचे कारण जबाबदार आहे. नायगावकरांची संपत गायकवाडसारखी कविता ही किस्सा आणि वात्रटिका यांचा अजब मिलाफ असते आणि प्रथमदर्शनी आवडणारी ही कविता दुसऱ्या वेळेला चक्क कंटाळवाणी वाटते. कारण तिच्यातले नाट्य एकदा ऐकले की संपते. चार्म खलास होतो. अनेकदा हेटॉरिक्सचा वा प्रतिमांचा अडाणी वापर काव्यवाचन करणाऱ्या कवींच्यांत दिसतो. श्रीधर तिळवे यांच्या पहिल्या संग्रहात हा प्रतिमांचा अडाणी वापर अधूनमधून रसिकाला दुखावत राहतो. वर सांगितलेले दोष हे काही कवींच्या नावाने सांगितलेले असले तरी प्रत्यक्षात ते प्रातिनिधिक आहेत. अगदी लोकनाथ यशवंतांपासून मंगेश बनसोडेपर्यंत सर्वांच्या कवितांत ते आढळतात. थोडक्यात, काव्यवाचनामुळे रसिकांच्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्याची प्रवृत्ती बोकाळत जाते आणि रसिकांची अभिरुची उंचावण्याऐवजी कवीचे कवित्वच खाली घसरते. रसिकांची संख्या वाढण्याऐवजी श्रोत्यांची संख्या वाढत राहते आणि रोमॅन्टिसिझमच्या मादक दारूत सगळेजण डुंबू लागतात. अनेकदा जनजागृतीच्या नावाखाली कवितेऐवजी काव्यात्मक भाषणे सादर होऊ लागतात. त्यामुळे क्रांती होत नाहीच, पण कवीचे कवित्व हकनाक हुतात्मा होते.

काव्यवाचनामुळे प्रसिद्धी मिळते, पैसा मिळतो हे खरे. पण हा काही विशेष गुण नाही. किंबहुना कलेच्या क्षेत्रात ही दुय्यम गोष्ट आहे. शेवटी कविता उत्तम की मध्यम की अधम हे कवितेच्या दर्जावर ठरते. तिला किती प्रसिद्धी मिळते आणि तिने कवीला किती पैसा मिळवून दिला ह्यावर नाही.

काव्यवाचनाच्या विरोधात असलेले सर्व युक्तिवाद आपण पाहिले आणि काव्यवाचनाच्या बाजूने मांडण्यात येणारे मुद्देही आपण पाहिले. ह्या दोन्ही बाजू मांडल्यानंतर प्रश्न निर्माण होतो की भविष्यात चौथ्या नवतेत काव्यवाचनाचे स्थान काय? ते तपासण्यासाठी आपण भविष्याच्या दृष्टीने थोडी तपासणी करू.

(१) सध्या महानगरात आलेली आणि इतरत्र येऊ घातलेली संस्कृती ही मौखिक नाही की लेखीही नाही. ती प्रत्यक्षात दृक्मौखिक आहे. ह्या दृक्मौखिक संस्कृतीची मुख्य उपकरणे टी.व्ही., चित्रपट, कॉम्प्युटर असून टेलिफोन, टेपरेकॉर्डर ही तिची उपमुख्य उपकरणे आहेत. दुर्दैवाने लघुनियतकालिकांतून आलेल्या देशी कवींची मजल लेखी संस्कृतीच्या पलीकडे कधीच गेली नाही. त्यांची सर्व संवेदनशीलता ही लेखी संस्कृतीने बद्ध केलेली होती. वसंत डहाकेसारख्या कवीची संवेदनशीलता ही इतकी पुस्तकी होती/आहे की कामू, काफ्का वगैरे मंडळी जन्मली नसती तर डहाकेंचे काय झाले असते असा प्रश्न पडावा. डहाके आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्या दरम्यान ही पुस्तके सतत उभी असल्याचे त्यांच्या कवितांतून जाणवते. (अर्थात त्यांच्या कवितेची गुणवत्ता हा वेगळा प्रश्न आहे) मग राजकीय अनुभवदेखील पुस्तकांतून प्राप्त झालेल्या पेशवाईमधून व्यक्त होऊ लागतो आणि सपाट होतो. एकीकडे डहाके तर दुसरीकडे नेमाडे. नेमाडेंना मौखिकतेचे इतके प्रेम की आधुनिक अनुभव देखील महाराजांनी लोकशैलीत मांडला आणि आमच्या अडाणी समीक्षकांनी तो नीट न तपासताच डोक्यावर घेतला. प्रत्यक्षात नेमाडेंच्या कवितेत नेमाडेंचा अनुभव पण भुईसपाट झालाय आणि लोकशैलीही भुईसपाट झाली आहे. नेमाडेंच्या लेखणीमधील मेलडीनंतरच्या कविता ह्या द्विमिती आहेत. त्यांना तिसऱ्या मितीला पारखे करण्यात नेमाडेंच्या मौखिक परंपरेवरील प्रेमाचा बराच वाटा आहे. चित्रे व कोलटकर हुशार. त्यांनी मौखिक संस्कृती पुस्तकांच्या तोंडात चघळायला दिली आणि मगच पचवली. परिणामी परंपरा नीट पचून अधिकच धारदार होऊन ह्यांच्या कवितेत प्रकटली. अशा लेखी आणि प्राचीन मौखिक परंपरेत अडकलेल्या लोकांनी उत्सवातील आधुनिक काव्यवाचनाला विरोध केला तर आश्चर्य कसले? तिथे आलेल्यांना 'बघे' म्हटले तर त्यात अनपेक्षित असे काय होते? पण येऊ घातलेली संस्कृती ह्या लोकांच्या दुर्दैवाने लेखी नाहीये, ती पुन्हा एकदा मौखिक होऊ घातलीये. याचा अर्थ तिच्यात लेखन दुय्यम आहे असे नाही, पण लेखन हे केंद्र मात्र नाही. ह्यापुढे कॅसेट संस्कृती आल्याने काव्यवाचन व काव्यश्रवण हा फार मोठा घटक राहणार आहे. मी स्वत: माझ्या कवितांचा एक संग्रह मित्रमैत्रिणींसाठी कॅसेट रेकॉर्डिंगमधून काढला होता. तो मर्यादित प्रमाणावर केलेला घरगुती प्रयोग होता. पण भविष्यात कवितांची ऑडिओ आवृत्ती चालू झाली तर आश्चर्य वाटावयास नको. हरिवंशराय

बच्चनच्या आणि फैजच्या कवितांच्या अशा ऑडिओ आवृत्त्या निघाल्या आहेत. तेव्हा भविष्यात काव्यवाचन ही एक अटळ घटना आहे; कारण आधुनिक संस्कृती ही लेखी नसून दृक्मौखिक आहे. (तिला दृक्श्राव्य असेही म्हणता येईल)

(२) काव्यवाचनात कवीचा नेमका रोख कळल्याने एकच एक अर्थ ठोसपणे पुढे येतो आणि त्यामुळे रसिकांच्या कल्पनाशक्तीला वाव मिळत नाही व संभाव्य अर्थ नष्ट होतात हे विधान वरकारणी योग्य वाटले तरी प्रत्यक्षात ते योग्य नाही. पहिली गोष्ट ही की, ज्या रसिकांची अनेक अर्थ शोधण्याची प्रवृत्ती असते त्याला लेखी कविता उपलब्ध असते. शेवटी काव्यवाचनात वाचली व ऐकली म्हणजे ती कविता व काव्यानुभव संपला असे होत नाही. नंतरही ती कविता पुन्हा वाचून तिच्या विविध शक्यता रसिक अजमावू शकतो. दुसरी गोष्ट लेखी कवितेतही सर्वच अर्थ एकदम दिसत नाहीत. तिथेही प्रथम वाचनात एक, नंतरच्या वाचनात एक असे अर्थ उलगडत जातात; तेव्हा लेखी कवितेच्या उपलब्धतेमुळे रसिक ती कविता वेगवेगळ्या पातळ्यांवर आस्वादू शकतो, फार तर काव्यवाचन ही ह्या प्रक्रियेची सुरुवात असते असे म्हणता येईल.

(३) जॅक देरीदाने लेखन प्रकियेचे चिन्हाच्या रेखनरूपाने महत्त्व ठसवले हे खरे असले तरी तो म्हणतो ते सर्व योग्य नाही. इथे जागेअभावी त्याच्या मतांचे खण्डन करता येणे शक्य नाही. फक्त देरीदा हा अंतिम शब्द नाही एवढेच इथे लक्षात घ्यावे.

(४) आधुनिक काळातील रसिक केवळ वाचक नाही तर तो दर्शक व श्रावकच (प्रामुख्याने) आहे. तेव्हा ग्रंथप्रसार व्हावा हे म्हणणे योग्य असले तरी कविता केवळ ग्रंथातूनच पोहोचायला हवी हा अट्टाहास आधुनिक संस्कृतीत योग्य नव्हे. साहिर लुधियानवीचा 'तल्खियाँ' ह्या काव्यसंग्रहातील कविता 'प्यासा'च्या ऑडिओ कॅसेटद्वारे घरोघरी पोहोचत. अलीकडे 'फैज'च्या नज्म व गझला अशाच 'फैज' नावाच्या कॅसेटद्वारे पोहोचवण्यात आल्या आहेत. आधुनिक कवीही अशा पद्धतीने भविष्यात पोहोचवता येणे अशक्य नाही. दिलीप चित्रे, मर्ढेकर, पु. शि. रेगे यांच्या कवितांच्या ऑडिओ कॅसेट का काढू नयेत?

(५) कविता ही केवळ महाजनसंस्कृतीत वावरते हा मुद्दा चुकीचा आहे. खरेतर कविता आणि तिची झिरपण ही एक गुंतागुंतीची प्रक्रिया असते. ती केवळ कवितेलाच नाही तर सर्वच कलांना लागू होते.

कुठल्याही संस्कृतीत तीन स्तर असतात.

(१) अभिजन

(२) मध्यमजन

(३) बहुजन

हे स्तर कलात्मक आवडीनिवडींचे आहेत हे ध्यानात घ्यावे. त्याचा आर्थिक, सत्ताशास्त्रीय, वा जातीय स्तराशी संबंध नाही. एखाद्या श्रीमंत माणसाची आवड बहुजन संस्कृतीशी निगडित असते, तर दलित माणूस अभिजात रसिक असतो. ह्या तीन स्तरांमुळे कलात्मक पातळीवर तीन पोटसंस्कृती वावरत असतात.

(१) अभिजात (Class Culture)

(२) मध्यमवर्गीय (Mass Class Culture)

(३) लोकसंस्कृती (Mass Culture).

ह्यातील लोकसंस्कृतीची कलात्मक गरज मर्यादित असते. उत्तम करमणूक, माफक उपदेश आणि त्या संस्कृतीला आदर्श वाटणाऱ्या मूल्यांचा पुरस्कार ह्या तीन गोष्टी एखाद्या कलाकृतीत आढळल्यां की हा वर्ग तिच्यावर खूष असतो. हा त्या कलाकृतीसाठी गर्दी करतो. ह्या कलाकृती निर्माण करणारे कारागीरही गर्दीची आवड-निवड बघून आपल्या कलाकृती घडवत असतात. ह्यातून लोकदेव आणि लोकदेवता (Public God & Godesses) यांचा उदय होतो. चित्रपटाच्या भाषेत ह्या कलाकृतींना व्यावसायिक चित्रपट म्हणतात. नाटकांच्या भाषेत ह्यांना व्यावसायिक नाटक तर चित्र, शिल्पाच्या भाषेत ॲप्लाईड आर्ट असं म्हणतात. ह्या बहुजनसमाजाची साहित्यिक गरज व्यावसायिक कादंबरीकार तर त्यांची काव्याची भूक गीतकार भागवतात. त्यांची संगीताची गरज फिल्मी संगीतकार भागवतात. त्यामुळेच सचिन, सुभाष घई, राजकुमार संतोषी, अमिताभ बच्चन, अलका कुबल, जुही चावला, माधुरी दीक्षित, समीर, आनंद बक्षी, प्रवीण दवणे, नदीम-श्रवण, आनंद-मिलिन्द, रांगोळी व मूर्ती कलावंत, कॅलेंडर्स चित्रकार, फिल्मी नर्तक व नर्तिका (सिल्क स्मिता, लीना दास वगैरे), सुहास शिरवळकर वगैरे वगैरे हे लोक ह्यांच्या लोकदेवता होतात, लोकदेव होतात. ह्या वर्गाच्या दृष्टीने ग. दि. माडगूळकर, जगदीश खेबूडकर, शांताराम नांदगावकर हेच कवी होत.

कलाकृतीमुळे रसिकांच्या जाणिवांचा आणि संवेदनशीलतेचा विस्तार आणि विकास व्हायला हवा असं म्हणणारा अभिजनांचा वर्ग प्रत्येक संस्कृतीत असतो. हा वर्ग त्यासाठी कष्ट घेण्याची तयारी दाखवतो. कलाकृती कळत नसेल तर पुनःपुन्हा पारायणे करतो. श्याम बेनेगेल, सत्यजित रे, नसरुद्दीन शाह, बलराज सहानी, स्मिता पाटील, अरुण खोपकर, कुमार गंधर्व,

भालचंद्र नेमाडे, दिलीप चित्रे, महेश एलकुंचवार, मल्लिका साराभाई, उदयशंकर, हेन्री मूर, एम. एफ. हुसेन वगैरेंबद्दल त्याच्या मनात आदर असतो. उथळ करमणुकीपेक्षा कलात्मक अनुभवाच्या समृद्धीकडे त्याचे लक्ष असते.

ह्या दोन वर्गाच्यामध्ये एक ना धड, इकडे ना धड तिकडे असा एक वर्ग असतो. त्याला लोकसंस्कृतीतील कलाकृती उथळ वाटतात, तर अभिजात कलाकृती दुर्बोध वाटतात. 'आई जेवू घालेना बाप भीक मागू देईना' अशी ह्या वर्गाची अवस्था असते. हा वर्ग कलेविषयी गंभीर असतो पण प्रबुद्ध नसतो. ह्या वर्गासाठी काही कलाकार कलाकृती निर्माण करतात. ऋषिकेश मुखर्जी, पूर्वकालीन राजकपूर, मेहबूबखान, जब्बार पटेल, गुल्जार, रेखा, जया भादुरी, मंगेश पाडगावकर, सुरेश भट, यशवंत देव, गुलाम अली, हृदयनाथ मंगेशकर, जहांगीर आर्ट गॅलरीतले पाट्या टाकणारे शिल्पशास्त्री, सुभाष अवचट सारखे चित्रकार, शिवाजी सावंत, रणजित देसाई, पु. ल. अशा लोकांचे हे लोक फॅन असतात. अनेकदा एका क्षेत्रात अभिजात कलानिर्मिती करणारे कलावंत रसिक म्हणून दुसऱ्या कलांबाबत ह्या वर्गात मोडतात.

कलासंस्कृतीतील नवे-नवे उन्मेष हे प्रथम अभिजात वर्गात प्रकट होतात, आस्वादले जातात. नंतर मध्यम वर्गात विस्तार पावतात व कित्येक वर्षांच्या वाटचालीनंतर हे उन्मेष बहुजन संस्कृतीत प्रसार आणि मान्यता पावतात. अनेक कलावंत तिन्ही स्तरांवर निर्मिती करतात. उदा. गुरुदत्त, ना. धों. महानोर. अनेक रसिक हे तिन्ही स्तरांवर आस्वाद घेत फिरतात. अनेकदा एकच कलाकृती तिन्ही स्तरांवर सारखीच अपील होते. उदा. व्यासांचे महाभारत किंवा शेक्सपिअरची नाटके (माझा कोसलाबाबतही हाच अनुभव आहे. सुहास शिरवळकर व गुरुनाथ नाईक यांचे फॅन असणाऱ्या व्यक्तींनाही ही कादंबरी वाचायला दिली की आवडते.) ह्या सर्व प्रक्रियेत गोंधळ माजतो तो कलावंताचा. स्वत:विषयी गैरसमज झाला की ! सर्वसाधारणपणे हा गोंधळ नेहमीच मध्यम दर्जाच्या कलावंतामुळे माजतो. ह्या कलावंताना नेहमीच असे वाटते की, आपण अभिजात कलावंत आहोत, पण अभिजन वर्गातले समीक्षक ह्यांची दखल घेत नसतात. मग त्यांच्या नावाने आणि अभिजात कलेच्या नावानेच हे कलावंत शंख करायला लागतात. त्यातच मध्यमवर्गीय लोकांची गर्दी त्यांच्यामागे असते. मग लोक आमच्या मागे आहेत, तुमच्या कलाकृती म्हणजे समीक्षकांच्या वर्तुळातील चर्चा अशी टीका चालू होते. सुरेश भट, मंगेश पाडगावकर, वसंत बापट हे असे मध्यम दर्जाचे कलावंत. सुरेश भटांनी केलेला आरडाओरडा, आदळ आपट सर्वजण जाणतातच. मंगेश पाडगावकर, वसंत बापटांनी अलीकडे समीक्षेवर चढवलेला हल्ला ह्याच प्रकारचा. ह्यात सर्वात जास्त गोची होते ती प्रसिद्धीसाठी हपापलेल्या अभिजात कलावंताची. त्याला अभिजात

कलाकृती निर्माण करता येते, पण रसिक निर्माण करता येत नाहीत. पण माणूस म्हणून त्याला दाद हवीशी वाटत असते. असे कलावंत स्वत:च कधी मध्यमवर्गाच्या तर कधी बहुजनवर्गाच्या पातळीवर उतरायला लागतात. ह्यातील काहींना यश मिळते, काहींना अपयश मिळते. उदा. उद्धव शेळके हा कादंबरीकार असाच घसरणीला लागला. अरुण म्हात्रे यांची वाटचाल ह्या दिशेने सुरू झालेली स्पष्ट दिसते. काही वेळा ही वाटचाल उलट दिशेनेही होते. उदा. हुसेन. फिल्मी बोर्ड रंगवत हा कलावंत वर गेला. काही कलावंत मात्र एकाच वेळी तिन्ही स्तरांवर निर्मिती करत राहतात. साहिर लुधियानवीने किंवा नीरजने फिल्मी गीते लिहीत आपली कवितांही शाबूत ठेवली. भटांनीही बहुजन आणि मध्यम ह्या दोन्ही वर्गातला तोल सुरेख सांभाळलेला दिसतो. मात्र अभिजात कवितेकडे जाण्याचा त्यांचा प्रयत्न पूर्ण फसलेला दिसतो. महानोरांनी बहुजनांसाठी लिहिता लिहिता अभिजात कविता सांभाळली खरी, पण तिचा कस कमी झालेला दिसतो.

कला संस्कृतीतील वरील सर्व गुंतागुंत लक्षात घेतली की, काव्यवाचनाच्या समस्यांची अधिक चांगली उकल होईल. दिलीप चित्रे जेव्हा गंभीर कवितेशी नाळ तुटली असे म्हणतात, तेव्हा त्यांना रसिकांची अभिजात कवितेपासून नाळ तुटली असे म्हणायचे असते. अरुण म्हात्रे व अशोक नायगावकर जेव्हा म्हणतात की ही नाळ लघुनियतकालिक चळवळवाल्यांनी तोडली, तेव्हा त्यांना असे म्हणायचे असते की लघुनियतकालिकवाल्यांनी अभिजात कलेची नाळ मध्यम व लोकसंस्कृतीशी जोडण्यासाठी काहीही केले नाही. जर बारकाईने विचार केला तर दोघेही एकच गोष्ट म्हणत आहेत, हे स्पष्ट दिसते. फक्त दोघांनीही वरील परिच्छेदात वर्णन केलेली गुंतागुंत न कळल्याने घोटाळा केला आहे.

चौथ्या नवतेचा शोध ह्या लेखात मी मराठीतील रोमॅन्टिक आधुनिक आणि देशी अशा तिन्ही नवतांचा उगम आणि प्रसार ह्यांविषयी काही विधाने केली होती. मराठी काव्यवाचनाच्या संदर्भातही ह्या नवतांबाबत एक गोष्ट जाणवते. मराठीत नवतेच्या अध्वर्यूंना कधीच काव्यवाचनाची तीव्र गरज वाटली नाही. उलट जे त्या नवतांचा विस्तार करावयास निघालेले असतात त्यांना मात्र हा विस्तार केवळ काव्यात्मक पातळीवर ठेवावासा वाटत नाही, तर ही नवतेची गंगोत्री समाजाच्या तळागाळात नेऊन ठेवावीशी वाटते. फुले, केशवसूत बालकवींनी काव्यवाचन फारसे मनावर घेतलेले नाही. पण रवीकिरण मंडळाने मात्र रोमॅन्टिक नवता जनमानसात नेली. आता तर ही नवता सामान्य जनांच्या हाडामांसात भिनलेली आहे. आपली सर्व मराठी व हिन्दी फिल्मी गाणी ही ह्या रोमॅण्टिक नवतेचाच विस्तार आहे. भारतीय संस्कृतीने ही नवता आत्मसात केली आहे, ह्याविषयी आता काडीचीही शंका नाही. दुसऱ्या नवतेतील मर्ढेकर, विस्तारासाठी हयात नव्हते.

त्यांनी काव्यवाचन फारसे मनावर घेतले नाही. पण त्यानंतर आलेल्या पाडगावकर, बापट, करन्दीकर यांनी मात्र ही नवता जनमानसात नेण्याचा प्रयत्न केला. मध्यमवर्गात ही नवता आता सजताना दिसते. मात्र पाडगावकर, बापट ह्यांनी प्रत्यक्ष काव्यवाचनात आपली नाळ मर्ढेकर, मुक्तिबोध यांच्याशी जोडण्याऐवजी रोमॅण्टिक नवतेशीच जोडली आणि अक्षरश: ह्या काव्यवाचन चळवळीचा सत्यानाश केला. तिसऱ्या नवतेतील अर्ध्वर्यू चित्रे, कोलटकर, नेमाडे (सुर्वे अपवाद) प्रभृतीनी पुन्हा एकदा काव्यवाचनाकडे दुर्लक्ष केले. पण ह्या नवतेचा विस्तार करणाऱ्या बागवे, नायगावकर, म्हात्रे ह्यांनी मात्र काव्यवाचन फारच मनावर घेतले. पण तिसऱ्या नवतेत एक गोष्ट घडली. पहिल्या नवतेतील केशवसुत काय किंवा बालकवी काय किंवा गडकरी काय अकाली मरण पावले. दुसऱ्या नवतेतील मर्ढेकरांचाही असाच आकस्मिक मृत्यू झाला. त्यामुळे विस्तार व प्रसार करू इच्छिणाऱ्या कवींना नायगावकर, म्हात्रेंसारखा जाब विचारायला संधीच मिळाली नाही; कारण अध्वर्यू हयातच नव्हते. तिसऱ्या नवतेत नेमके उलटे घडले. एकतर सर्व अध्वर्यू हयात आहेत आणि ह्या अध्वर्यूंनी नंतरच्या विस्ताराशी जी नाळ जोडायला हवी होती ती अजिबात जोडली नाही. ह्या नवतेचा विस्तार करण्याची जबाबदारी पाडगावकर, बापट, करन्दीकर ह्या त्रयींवर अजिबात नव्हती कारण ते त्यांची ऐतिहासिक कामगिरी पार पाडत दुसऱ्या नवतेचा विस्तार करत होते. ह्या तिघांना चित्रे यांनी आरोप करून जो जाब विचारलाय तो चोराच्या उलट्या बोंबा ह्या प्रकारातला आहे. चित्रे स्वत: अमेरिकेत आणि भोपाळमध्ये कवितेचा विस्तार करत राहिले आणि मराठीत आपली नवता विस्तारित करण्यांऐवजी आंतरराष्ट्रीय फिरतीवर विस्तारत राहिले. वास्तविक आपली नवता विस्तारित करण्याची जबाबदारी चित्रे, कोलटकर, काळसेकर वगैरेंची होती आणि त्यांनी त्याबाबत बेजबाबदारपणा दाखवला. नेमाडेंनी तर वर्तमानपत्रांवर टीका करून व त्यांच्याकडे पाठ फिरवून ह्या बेजबाबदार वृत्तींचा कळस गाठला. आपण एका विकसनशील देशाच्या कलात्मक संस्कृतीत वावरतोय हे विसरून हे लोक जणू युरोपमध्ये जन्मल्याच्या थाटात नवता सुरू करून रिकामे झाले. त्यातल्या त्यात नेमाडेंनी कादंबरीबाबत वैयक्तिक पातळीवर बरीच काळजी घेतली; पण वर्तमानपत्राविषयीचा आकस त्यांना आड आला. समूह हा तर जणू ह्या लोकांचा शत्रू होता. जनसंस्कृतीच्या गप्पा मारत प्रत्यक्ष जनसंपर्कापासून दूर राहणारी जमात अशी लघु-नियतकालिकवाल्यांची प्रतिमा आपोआपच तयार झाली. गंभीर कवितेपासून रसिक दूर राहिले हा जो चित्रे यांचा आरोप आहे त्याला वास्तविक जबाबदार त्यांचीच पिढी आहे. दशकाच्या कवितांमधील कवींवर वास्तविक चर्चा चित्रे, कोलटकर यांनी करायला हवी होती. ग्रंथालीने बोलवले नसेल तर स्वत: किमान वर्तमानपत्रे किंवा मासिके ह्यांतून चर्चा करायला हवी होती. पण

ह्यावर चर्चा केली ती पाडगावकर, रमेश तेंडुलकरांनी. परिणाम एकच झाला, लोकांनी हा विस्तार तिसऱ्याऐवजी दुसऱ्या नवतेशी जोडला आणि ही पिढी अक्षरश: कापली गेली. त्यातच ह्या काळातील समीक्षकांनी चित्रे, कोलटकरांच्यावर चर्चा करण्याऐवजी मर्ढेकरांच्या सौंदर्यामीमांसेवर फालतू चर्चा केली. दलित कविता ही जेवढी चर्चेची बाब होती तेवढीच चित्रे, कोलटकरांची कविताही होती. ह्यातील काही लोकांचा 'मेरा आळस महान' हा नारा इतका उंच होता की, स्वत:चे काव्यसंग्रह नीट प्रकाशित करण्याची तसदीही ह्या लोकांनी घेतली नाही. बिचाऱ्या अशोक शहाणेंवर किती भार टाकायचा ह्याचा काही विचार?

जे लोक स्वत:च्या कविता धड प्रकाशितही करत नव्हते ते आपल्या कविता कॉलेजेस, साहित्य संमेलने इथे जाऊन वाचतील ही अपेक्षा ठेवणे म्हणजे भारत 'स्टार वॉर्स' करणार असे म्हणण्यासारखे होते. ह्यांचे परिणाम आमच्या आधीच्या व आमच्या पिढीवर अतिशय वाईट झाले. चित्रेंच्या एकूण कविता आधी प्रकाशित होत्या, तर त्याचा परिणाम आमच्या पिढीवर किती वेगळा झाला असता ह्याची चित्रे यांना कल्पना आहे का ? त्यामुळे आमच्या पिढीचे किती नुकसान झाले हे चित्रे यांना कळणार आहे का ? आमच्या ऐन तारुण्यात हे संग्रह हाती पडते किंवा काव्यवाचनाद्वारे हे कवी आमच्या गावात येते तर आम्ही निश्चितच अधिक परिपक्व झालो असतो. त्याऐवजी आमच्यापर्यंत आले ते सुरेश भट आणि पाडगावकर, बापट. परिणामी महाराष्ट्रांत सर्वत्र गझलांचे बारमाही पीक ! सुरेश भटांनी जो नवीन पिढीविषयी कळवळा किंवा आस्था दाखवली त्याच्या निम्मी आस्था जरी हे लघुनियतकालिकवाले दाखवते, तर आज महाराष्ट्रात कवितेची जी अवस्था झाली ती झाली नसती. भटांचे दोष काहीही असोत, पण भटांचे नवीन पोरांविषयीचे प्रेम हा एक सुंदर विषय आहे. भटांना ह्याबाबत मानलेच पाहिजे. त्याचा परिणाम म्हणूनच महाराष्ट्रात तिसरी देशी नवता फोफावण्याऐवजी गझल अधिक फोफावली. एकीकडे तिसऱ्या नवतेचे अध्वर्यू विस्तारापुरते जिवंत असून मृत तर दुसरीकडे विस्तार करणारे, समीक्षेसाठी लागणाऱ्या चिकित्साबुद्धीबाबत व काव्याच्या प्रतिभेबाबत लंगडे. दशकातील कवितेमधल्या कवींना चित्रे, कोलटकरांच्या कवितेची चिकित्सा करावीशी वाटली नाही. किंबहुना समीक्षेसाठी एक वेगळी प्रतिभा लागते, ती ह्यातील अनेकांजवळ नव्हती. त्यांना लागूनच जन्मलेल्या अरुण म्हात्रे, नायगावकर यांनी तरी काय केले ? दिलीप चित्रे, काळसेकर, अरुण कोलटकर यांनी त्यांचे काम केले नाही हे कबूल, पण नंतरच्या म्हात्रे वगैरेंनी ही नवता पुढे नेली काय ? मला स्वत:ला जाणवलेली एक गोष्ट अशी की, फुले केशवसुतांनी नवता सुरू केल्यानंतर त्यांचा विस्तार करणाऱ्यांनी त्यांच्यापेक्षा सरस अशी कविता लिहिली. फुले, केशवसुतांपेक्षा बोरकर, पु. शि. रेगे

केव्हाही श्रेष्ठ आहेत. हीच गोष्ट मर्ढेकरांबाबत. त्यांच्यानंतरच्या विस्तार करणाऱ्या करन्दीकर, विलास सारंग, डहाके, सदानंद रेगे यांनी त्यांच्याइतकीच सरस कविता लिहिली. ह्याउलट चित्रे, कोल्टकर, ढसाळ, काळसेकर, ओक यांच्यापुढे 'दशकांचे कवी' किंवा म्हात्रे, नायगावकर, तेंडुलकर, इंद्रजित भालेराव, लोकनाथ, यशवंत हे विस्तार करणारे कवी ठेवले तर अध्वर्यूंच्यापेक्षा नंतरच्या लोकांची कविता फारच खालच्या दर्जाची वाटते. वस्तुस्थिती अशी होती की, विस्तार करणाऱ्या पिढीने तिसऱ्या नवतेची पाळेमुळेच नीट अभ्यासली नाहीत. त्यातच ह्यातल्या काहीजणांचा पाय पहिल्या व दुसऱ्या नवतेत अडकलेला. आपल्याला काय नाकारायचे आहे हेदेखील ह्यांना नीट उमगले नाही. अरुण म्हात्रे, नितीन तेंडुलकर प्रभृतींची रोमॅण्टिक धुक्यातून पुरती सुटका न झाल्याने तीन नवतांच्या कैचीत ही विस्तार पावणारी पिढी सापडली. पाडगावकरांनी व बापटांनीआपला एक पाय रोमॅण्टिक कवितेत तर दुसरा पाय मर्ढेकरांच्यात ठेवून रसिकांच्या छान टाळ्या मिळवल्या. नेमक्या तशाच नादात ह्या पिढीने एक पाय रोमॅण्टिक नवतेत तर दुसरा पाय सत्यकथेत, तिसरा पाय लघुनियतकालिकात ठेवला. परिणामी पाडगाकर, बापट जसे भुईसापट झाले तसेच अरुण म्हात्रे, अशोक बागवे वगैरे भुईसपाट झाले. काव्यवाचन करताना ज्या चुका बापट, पाडगावकरांनी केल्या त्याच चुका ह्यांनीही केल्या त्यामुळे रसिकांच्यापर्यंत तिसरी नवता नीट पोहोचलीच नाही. काव्यवाचनामुळे जे शक्य नव्हते किंवा नसते ते नियतकालिक किंवा अनियतकालिकाबाबत शक्य होते, पण त्याबाबतही म्हात्रे वगैरेनी सावळा गोंधळच घातला. चित्रेंना जाब विचारणाऱ्या म्हात्रेंनी तरी अक्षर चळवळीतून असे काय दिवे लावले? वर्तमानपत्रात ज्या गोष्टींची चर्चा करायची त्याची चर्चा जर संपादकीयातून वारंवार होणार असेल तर मग तुमची संपादकीये हवीत कशाला? सरळ वर्तमानपत्रांत लिहा. अक्षर चळवळीतील अनेक लेख हे सत्यकथेतल्या प्रश्नांचीच चर्चा करतात हे म्हात्रे यांच्या लक्षात आले नाही. देशी चळवळीची चिकित्सा करत तिची व्याप्ती वाढवत नेली किंवा ह्या देशी चळवळीला स्वत:च्या प्रतिभेने नवे आयाम दिले असते तरच अक्षर चळवळीला नव्यांची चळवळ म्हणता आले असते. त्याऐवजी अक्षर चळवळीचे नाते सत्यकथेशी जुळत गेले आणि अक्षर चळवळ ही रोमॅण्टिक कवितांची आश्रयस्थान बनून राहिली. अरुण म्हात्रे, नायगावकर प्रभृतींची देशी चळवळीला नवे आयाम देण्याची ताकद होती, प्रतिभा होती, फक्त चिकित्सेचा अभाव नडला. आज पाटील, नेमाडे यांच्या कवितेची सखोल चिकित्सा अनुष्टुभ वगैरे करताना दिसतात. त्याची ज्या दिवशी आम्हा नव्या लोकांना लाज वाटेल तो सुदिन होय. थोडक्यात, तिसऱ्या नवतेच्या विस्ताराबाबत ना अर्ध्वर्यूनी ना नंतरच्या महारथींनी आपली जबाबदारी पार पाडली असे दिसते. म्हणूनच चित्रे

यांनी हा आरोप नंतरच्या पिढीवर करायला हवा होता आणि चित्रे यांना तात्त्विक पातळीवर खणखणीत जाब म्हात्रे यांनी विचारायला हवा होता. दोघांनीही आपले बाण नीट मारले नाहीत आणि आमच्यावर हा लेख लिहिण्याची पाळी आली.

एकीकडे विस्तारकवींची ही अवस्था तर दुसरीकडे समीक्षकांनीही ह्याबाबत आपली जबाबदारी पार पाडली नाही. अरुणा ढेरे ही कवयित्री चांगली समीक्षक असूनही सत्यकथेच्या पाट्या गिरवत बसली. म. सु. पाटील, गंगाधर पाटील ज्यांच्याकडे चिकित्सेची क्षमता होती त्यांनी त्यांच्या ह्या समकालीन कवींची चिकित्सा करायला हवी होती आणि तीही त्यांच्या कवितेबरोबरच; पण ही मंडळी मागील नवतेतील रेगे मंडळींत अधिक गुंतली. त्यामुळे नंतरच्या कवींना ह्यांची सामर्थ्यस्थळेही कळली नाहीत किंवा मर्यादाही उमगल्या नाहीत. परिणामी सर्व काव्यवाचन करणारी नवी टोळकी पहिल्या व दुसऱ्या नवतेला सामील झाली आणि समीक्षेचा दरवाजाही बंदच राहिला.

चित्रे म्हणतात त्याप्रमाणे, केवळ रसिकांची नाळ तुटली नाही तर खुद्द कवींचीही नाळ तुटली आणि ह्याला जबाबदार वरील सर्व कारणे होती. अशा स्थितीतही विवेक राजापुरे, दिलीप धोंडो कुलकर्णी, ह्यांसारखी विस्तार करणारी अस्सल मंडळी निपजलीच. ह्या लोकांच्या कविता म्हात्रे, बागवे वगैरेंच्यापेक्षा कित्येक पटींनी उजव्या आहेत आणि ह्यांच्याच कवितांवर समीक्षा लिहायला हवी. पाडगावकर, बापट जसे रेगे, ग्रेसपेक्षा जास्त भाव खाऊन गेले तशीच अवस्था ह्या कवींची म्हात्रे, बागवे यांच्यामुळे झालीय.

वरील सर्व विवेचनावरून एक गोष्ट सहज स्पष्ट होईल ती म्हणजे नवतेचा विस्तार करू पाहणाऱ्या पिढीला काव्यवाचन करणे हे नेहमीच आवश्यक वाटते. त्यामुळेच म्हात्रे, नायगावकर आज एवढ्या निकराने भांडत आहेत. मात्र बागवे, नायगावकर, म्हात्रे यांचे तिसऱ्या नवतेतले पाडगावकर, बापट होणार नाहीत याची त्यांनी काळजी घेणे आवश्यक आहे, असे वाटते. तिघांच्यातही सुप्त रोमॅण्टिक राक्षस लपलेला आहे. तो कविता खाणारच नाही याची खात्री नाही. काव्यवाचनात रसिक नेहमी रोमॅण्टिक कवितांची मागणी करतात आणि कवी ती पुरवण्याच्या नादात खाली उतरतात, अनेकदा कवित्व घसरते. ह्या आक्षेपात निश्चितच तथ्य आहे. मात्र ह्यावर उपाय काव्यवाचन बंद करणे हा नसून आपणास खाली उतरावे लागणार नाही ह्याची काळजी घेणे हा आहे. यदाकदाचित खाली उतरलोच तर आपण खाली उतरलो आहोत ह्याचे पक्के भान हवे. अन्यथा हे भान लोप पावून कवीचा गीतकार व्हायला वेळ लागत नाही.

(६) काव्यवाचनात नवतेचा विस्तार व प्रसार होणे हा हेतू साध्य व्हायचा असेल तर साहित्यातील कंपूशाही बंद होणे अत्यंत आवश्यक आहे. साहित्य संमेलनात सुरेश भट, शंकर वैद्य यांच्याबरोबरच दिलीप चित्रे, वसंत डहाके, सतीश काळसेकर यांना बोलवायला हवे. केवळ लोकांना आवडतात ते कवीच बोलवायचे हा पायंडा बंद पाडायला हवा, त्याचबरोबर अभिजात कवींनीही बहुजनांच्या संस्कृतीत सामील व्हावे. त्यासाठी आपला श्रेष्ठत्वाचा अहंकार बाजूला काढून ठेवावा. संमेलनात सुरेश भटच अधिक टाळ्या घेणार हे उघड असते; पण म्हणून नाउमेद होऊ नये. तिथे झालेल्या पाच हजारात निदान शंभर श्रोते तरी गंभीर रसिक असतात. त्यांच्यासाठी आपण कविता वाचतोय असे समजून कविता वाचावी.

(७) शेवटी दिलीप चित्रेंचा काव्यत्रयीने बघेच निर्माण केले हा आरोप ! ह्या त्रयीने निदान बघे तरी निर्माण केले. दिलीप चित्रेंनी हे बघेही निर्माण केले नाहीत त्याचे काय? दिलीप चित्रेंना वाटते तसे काव्यवाचनाला सर्वच बघे नसतात. खुद्द चित्र्यांच्या कवितेचे जाणकार वाचक मला संमेलनातून भेटले आहेत. अनेकदा तर गंमत म्हणून आलेला बघा नंतर जाणकार रसिक म्हणून रूपांतरित झाला आहे. काव्यवाचन करणाऱ्या कवींचे संग्रह त्यांच्या श्रोत्यांच्या उपस्थितीपेक्षा फारच कमी खपतात हे खरे; पण चित्रेंचे अजिबातच खपत नाहीत त्यापेक्षा ह्यांचे कमी खपतात हे अधिक बरे ! काही सुबुद्ध आपोआपच ह्या कवितेला कंटाळून अभिजात कवितेकडे वळतातच. मी स्वत: कवितेत अडकलो तो गालिबमुळे. गालिबनंतर मराठी कविता; त्यातही करन्दीकर, भट वगैरे प्रथम आणि नंतरच दिलीप चित्रे असा प्रवास झाला. हा प्रवास दीड महिन्यातच झाला. पण तो शेवटी ह्याच क्रमाने झाला. तेव्हा चित्रेंनी बघ्यांना नावे ठेवू नयेत हे उत्तम. बघे निर्माण करणारे कवी हे टीकेचा विषय होऊ शकतात; पण टिंगलीचा मात्र नाहीच नाही. अशा प्रकारच्या बघ्यांची संमेलने ही समाजाची गरजचं असते, किंबहुना लोकांना उत्सवाची गरज असतेच असते. ह्यातूनच शेवटी काहीजण गंभीरपणे साहित्याकडे वळतात.

(८) सर्वात शेवटचा मुद्दा पैसा व प्रसिद्धीचा. हा मुद्दा कलात्मक पातळीवर दुय्यम असेल पण पोटापाण्याच्या पातळींवर महत्त्वाचा आहे. जर कोणी पोट भरण्यासाठी लोकांच्या आवडीप्रमाणे गीते लिहून देत असेल तर त्याला तो हक्क आहे. शेवटी स्मगलिंग करण्यापेक्षा किंवा राजकारणी बनून लोकांना टोप्या घालण्यापेक्षा हा धंदा अधिक चांगला. लोकांनी कलेवर जगू नये, त्यासाठी वेगळा धंदा करावा असे म्हणणे सोपे आहे; पण प्रत्येकालाच ते जमेल असे नव्हे. एखाद्याला जर हे जमत नसेल तर लोकांना शरण जाऊन रंजक कलाकृती निर्माण करण्याखेरीज त्यांच्यापुढे पर्याय राहात नाही. अभिजात कलानिर्मितीवर जगणे ह्या देशात तरी शक्य नाही. शिवाय पेंटर चित्रे

विकून, जाहिराती करून, संगीतकार गायक गाण्याच्या मैफिली करून पैसा कमवत असताना. फक्त कवींनी मात्र तो कमवू नये असे सांगणे निर्बुद्धपणाचे आहे. माझ्या मते कवींनी वेळप्रसंगी फिल्मी गीते लिहून पैसा कमवावा, पण ही तडजोड आहे याचे भान ठेवावे. उगाच व्यावसायिक नाटके लिहून कानेटकरांसारखा अभिजात कलावंताचा आव आणू नये. शेवटी खोटा आव आणणे, करणे हे वाईट. बुद्धाने एकदा एका चोराला उपदेश करताना भान राखून चोरी कर असे सांगितले होते. पण त्या चोराला भान राखले की चोरीच करता येत नसे त्यामुळे दोन तीन दिवसात त्याने जशी चोरी सोडून दिली व बुद्धाचे शिष्यत्व पत्करले तशी अवस्था झाली तर बेहोश होऊन किंवा भान विसरून चोरी करण्याचा पर्याय निवडू नये. शांतपणे अभिजात कलेचे शिष्यत्व पत्करावे.

थोडक्यात ह्या अत्याधुनिक काळात कलावंताना काव्यवाचन / कथाकथन ह्यासारख्या मिडियाप्रधान कृती टाळता येणे शक्य नाही त्यामुळेच काव्यवाचनाविरोधात ओरड करण्यापेक्षा आत्मभान राखून ते कसे अधिक चांगल्या रीतीने करता येईल ह्यावर नवीन कलावंतानी लक्ष ठेवावे हे उत्तम. आत्मभान राखून केलेली कोणतीही कृती योग्यच असते. काव्यवाचन त्याला अपवाद नाही. मात्र ज्यांना हे आत्मभान राखता येणार नाही त्यांनी शेवटी स्वतःशी प्रामाणिक राहून ते टाळावे हे उत्तम. आयुष्यात स्वतःशी प्रामाणिक असणे हे सर्वात महत्त्वाचे. बाकीच्या कलानिर्मिती, सत्ता, पैसा ह्या सर्व गोष्टी दुय्यम आहेत.

